**महाराष्ट्र विकास सेवा गट -अ मधील अधिकाऱ्यांच्या पदस्थापना.**

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
### शासन आदेश क्रमांक : मविसे-१०१८/प्र.क्र.२६/२०१८/आस्था-३,

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, मुंबई - ४०० ००१.
तारीख : ९ ऑक्टोबर, २०१८.

**शासन आदेश :-**

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम , २००५ मधील तरतुदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने आणि उक्त अधिनियमाच्या कलम ४(४) व ४(५) मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या पूर्वमान्यतेने या विभागातील श्री .वाय.एस. महांगडे, प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जि.अकोला (सध्या ग्राम विकास विभागात सह संचालक, (आर्थिक सेवा) या पदावर उसनवारी तत्वावर कार्यरत) यांची उप संचालक, आमदार आदर्श व सांसद आदर्श ग्राम योजना, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान , नवी मुंबई या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे.

२. श्री.वाय.एस. महांगडे यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा . तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक : सीडीआर १०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास , ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

३. संबंधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी श्री .महांगडे यांना त्यांच्या सध्याच्या पदभारातून तात्काळ कार्यमुक्त करावे व त्यांच्या नियुक्तीच्या जागी तात्काळ रुजू होण्यास सांगावे.

४. श्री.वाय.एस. महांगडे यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास कळवावा.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१००९११२९१९३८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ananda Shankar Shendage

Digitally signed by Ananda Shankar Shendage
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0db7067f83b51744741b4485650edc8705560188be635df819605b4913ead056, serialNumber=dced31ba3ba0e455430f67304905c6e3544dae39602268d4cf2844818a1f80a4, cn=Ananda Shankar Shendage
Date: 2018.10.09 13:08:05 +05'30'

(आ.शं. शेंडगे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) मा. मंत्री ( ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
३) मा. राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
४) मा. सचिव (ग्राम विकास व पंचायत राज) यांचे स्वीय सहायक.
५) विभागीय आयुक्त , अमरावती / कोकण
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद , अकोला
७) जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला
८) महालेखापाल - १/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
९) श्री.वाय.एस. महांगडे, प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जि.अकोला (मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद, अकोला यांचेमार्फत)
१०) कार्यासन, (आस्था-१ /आस्था-२), ग्राम विकास विभाग
११) निवड नस्ती (आस्था-३), ग्राम विकास विभाग.